आदिवासी क्षेत्र उपयोजना/ आदिवासी क्षेत्राबाहेरील उपयोजना सन २०१५-१६ चे राज्यस्तरीय योजनानिहाय अर्थसंकल्पीत करण्यात आलेल्या **"आरोग्य सेवा"** या उपशिर्षाखालील तरतूदीचे वाटप

# महाराष्ट्र शासन
## आदिवासी विकास विभाग
## शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०१५/प्र.क्र.०५/कार्यासन.६

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२

तारीख: २९ जून,२०१५

**वाचा -**

१) वि.वि, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१५/प्र.क्र.८२/अर्थ-३, दि.३०.३.२०१५.

२) वि.वि, शासन परिपत्रक क्र.अर्थसं २०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दि.१७.४.२०१५

३) सार्वजनिक आरोग्य विभागाची नस्ती क्र.रागांयो २०१५/प्र.क्र.१८९/आरोग्य-६

**शासन निर्णय -**

आदिवासी उपयोजनांतर्गत **"आरोग्य सेवा"** या उपशिर्षाखाली सन २०१४-१५ च्या अर्थसंकल्पीय अंदाजपत्रकात समाविष्ट करण्यात आलेल्या तरतुदीचे योजनानिहाय वाटप आणि नियंत्रण अधिकारी सोबत जोडलेल्या विवरणपत्रात दर्शविले आहेत. आदिवासी उपयोजनेंतर्गत सदर निधी राजीव गांधी जीवनदायी आरोग्य योजना या योजनेसाठी उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

२. आदिवासी क्षेत्र उपयोजनेखालील "आरोग्य सेवा" या उपशिर्षाखालील योजनांना सोबतच्या विवरण पत्रातील स्तंभ क्र.२ मध्ये दर्शविलेल्या तरतुदी वितरणास मंजूरी देण्यात येत आहे. तसेच ती रक्कम स्तंभ क्रमांक ३ मध्ये दर्शविलेल्या नियंत्रण अधिका-यांच्या अधिनस्त ठेवण्यास मंजूरी देत आहे. त्याचप्रमाणे सर्व नियंत्रक अधिकारी / अंमलबजावणी अधिकारी यांनी सदर तरतूदी खर्च करतांना वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अंदाज २०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दि.१७.४.२०१५ च्या मार्गदर्शक सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

३. नियंत्रण अधिकारी आणि विभागप्रमुख यांनी ही तरतुद शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्र.टिएसपी-१०८६/८७१०/प्र.क्र.३१/का.५ दिनांक ९.३.१९९० अन्वये निश्चित केलेल्या आदिवासी उपयोजना क्षेत्र व क्षेत्राबाहेरील मान्य योजनांवर खर्च होतील याची दक्षता घ्यावी. तसेच या तरतूदी खर्च करतांना शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र.टिएसपी-२००३/प्र.क्र.१०१/का-६, दिनांक २६ जुलै, २००४ व टिएसपी-२००५/प्र.क्र.५९/का-६, दिनांक १० नोव्हेंबर, २००५ मधील अटींचे कटाक्षाने पालन करण्याची दक्षता घेण्यात यावी. तसेच प्रस्तुत शासन निर्णयाद्वारे वितरित करण्यात येत असलेल्या तरतूदी मासिक खर्च विवरणपत्राप्रमाणे खर्च करण्याची दक्षता सर्व नियंत्रक अधिका-यांनी घ्यावी.

४. आदिवासी उपयोजनेंतर्गत उपलब्ध करुन दिलेली तरतूद फक्त आदिवासी लोकांकरिता वा आदिवासी उपयोजना क्षेत्रांतर्गत खर्च करण्यात यावी. तसेच आदिवासी क्षेत्राबाहेरील क्षेत्रासाठी केलेली तरतूद त्या क्षेत्रातील आदिवासी लोकांकरिता खर्च करण्यात यावी. आदिवासी उपयोजनेंतर्गत केलेली तरतूद आदिवासी क्षेत्राबाहेर किंवा सर्वसाधारण योजनेखाली खर्च करण्यात येवू नये. जर आदिवासी

उपयोजनेत केलेली तरतूद खर्च झाली नाही तर सदर तरतूद प्रत्यार्पित करावी व कोणत्याही परिस्थितीत आदिवासी क्षेत्राबाहेर खर्च करण्यात येवू नये. जर आदिवासी उपयोजनेची तरतूद आदिवासी क्षेत्राबाहेर खर्च झालेली आढळल्यास याबाबत सबंधित क्षेत्रिय अधिकारी, यांना जबाबदार धरण्यात येईल. तसेच आदिवासी उपयोजनेंतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल लेखाशिर्षनिहाय/उप लेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती सबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक, संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास, सार्वजनिक आरोग्य विभाग व आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत न चुकता पाठवावी.

५. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रात तसेच आदिवासी उपयोजने क्षेत्राबाहेरील योजनांवर केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजने क्षेत्राबाहेरील योजनांवर होणा-या खर्चावर लक्ष ठेवता येईल व तो केंद्रशासनाला कळविता येईल.

६. नियंत्रण अधिकारी/विभाग प्रमुख यांनी प्रचलित नियम प्रचलित कार्यपध्दती व सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन उपरोक्त परिच्छेद क्र ४. मधील सूचनानुसार खर्च करावा. हे आदेश फक्त अंमलबजावणी /नियंत्रक अधिका-यांच्या अधिनस्त ठेवलेल्या तरतुदीस प्रशासकीय दृष्टया मान्य केलेल्या योजनांवर खर्च करण्यासाठी आहे. याची अंमलबजावणी अधिका-यांनी नोंद घ्यावी.

७. आदिवासी उपयोजनेअंतर्गत आदिवासी क्षेत्र उपयोजना (टिएसपी) व आदिवासी क्षेत्राबाहेरील उपयोजना (ओटिएसपी) यांचा खर्च स्वतंत्रपणे नोंदविण्यासाठी लेखाशिर्षामध्ये काही बदल करण्यात आले असल्यास हे बदल लक्षात घेवून खर्च नोंदविताना सुधारित लेखाशिर्ष नोंदविण्याची दक्षता सर्व संबंधितांनी घ्यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६२९१५०९४३५९२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Bhagwan Maruti Sawant

Digitally signed by Bhagwan Maruti Sawant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Bhagwan Maruti Sawant
Date: 2015.06.29 15:55:17 +05'30'

( भगवान सावंत )
कार्यासन अधिकारी

प्रत,

१. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.

२. महासंचालक, आरोग्य सेवा, मुंबई

३. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.

४. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.

५. विभागीय आयुक्त, मुंबई / नागपूर/ औरंगाबाद/ नाशिक/ अमरावती/ पुणे.

६. वित्त विभाग (बजेट) / नियोजन विभाग(बजेट), मंत्रालय, मुंबई-३२

७. सार्वजनिक आरोग्य विभाग (आरोग्य-६), मंत्रालय, मुंबई

८. कार्यासन अधिकारी (का.क्र. २, ८ ), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई

९. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग.

## आदिवासी क्षेत्र उपयोजनेखालील २०१५-१६ चे जिल्हानिहाय अंदाजपत्रकीय तरतूदीचे वाटप

<table>
<tr><td colspan="2">शिर्ष : आरोग्य सेवा<br>योजनेचे नांव : राजीव गांधी जीवनदायी आरोग्य योजना<br>(राज्यस्तरीय योजना)<br>(रु.हजारात)</td><td colspan="3">मागणी क्र.टी-५<br>मुख्य लेखाशिर्ष : २२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य- पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-०३-ग्रामीण आरोग्य सेवा-विषम चिकित्सा-७९६-जनजाती क्षेत्र उपयोजना (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना (०१) (०३) राजीव गांधी जीवनदायी आरोग्य योजना<br>(२२१० ई ४९१) ३१, सहाय्यक अनुदान (वेतनेतर)</td></tr>
<tr><th>जिल्हयाचे नांव</th><th>२०१५-१६ साठी केलेली तरतूद</th><th>२०१५-१६ अर्थसंकल्पीय तरतूद सुपुर्द करण्यात आलेला नियंत्रक अधिकारी</th><th>प्रशासकीय विभाग</th><th>शेरा</th></tr>
<tr><td>१</td><td>२</td><td>३</td><td>४</td><td>५</td></tr>
<tr><td>एकूण</td><td>२१०००</td><td>प्रधान सचिव<br>सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई</td><td>सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.</td><td></td></tr>
</table>

----------------